ऊर्ध्व पैनगंगा प्रकल्पांतर्गत हिंगोली जिल्ह्यातील कळमनुरी व हिंगोली तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांतील नागरी सुविधा कामांसाठी निधी उपलब्ध करुन देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन शुद्धिपत्रक क्रमांक: अर्थसं- २०२३/प्र.क्र.१०५/र-८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: २४ जुलै, २०२४

वाचा -

१) शासन निर्णय समक्रमांक दि. ०८.०७.२०२४

२) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, हिंगोली यांचे पत्र जा.क्र. जिपहिं/बांध/लेखा-१/कावि/१४१८/२०२४, दि. १६.०७.२०२४

**प्रस्तावना-**

ऊर्ध्व पैनगंगा प्रकल्पांतर्गत हिंगोली जिल्ह्यातील मौजे सांडस, गाडीबोरी, सावरगाव, बोरजा व गांजापूर (ता. हिंगोली) तसेच मौजे खडकद खु. व गारोळ्याची वाडी (ता. कळमनुरी) या पुनर्वसित गावठाणांतील नागरी सुविधा कामांसाठी संदर्भीय क्र. १ येथे नमूद शासन निर्णयान्वये एकूण रूपये ६,०१,०७,८६८/- (रूपये सहा कोटी एक लक्ष सात हजार आठशे अडुसष्ट फक्त) एवढा निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, हिंगोली यांच्या ऐवजी मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद हिंगोली यांचेकडे अर्थसंकल्प वितरणप्रणाली BEAMS द्वारे तात्काळ वितरित करण्याबाबत आवश्यक दुरुस्ती करण्याची विनंती संदर्भीय क्र. २ येथे नमूद पत्रान्वये शासनास करण्यात आली असून त्यानुसार दुरुस्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

ऊर्ध्व पैनगंगा प्रकल्पांतर्गत हिंगोली जिल्ह्यातील मौजे सांडस, गाडीबोरी, सावरगाव, बोरजा व गांजापूर (ता. हिंगोली) तसेच मौजे खडकद खु. व गारोळ्याची वाडी (ता. कळमनुरी) या पुनर्वसित गावठाणांतील नागरी सुविधा कामांसाठी निधी वितरीत करण्याबाबतच्या संदर्भीय क्र. १ येथे नमूद शासन निर्णयातील परिच्छेद क्र. २ मधील अट क्र. १ "विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर यांनी त्यांना या आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित नियंत्रण अधिकारी म्हणून संबंधित कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, हिंगोली यांचेकडे अर्थसंकल्प वितरणप्रणाली BEAMS द्वारे तात्काळ वितरित करावा" या ऐवजी **"विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर यांनी त्यांना या आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित नियंत्रण अधिकारी म्हणून संबंधित मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद हिंगोली/ कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, हिंगोली यांचेकडे अर्थसंकल्प वितरणप्रणाली BEAMS द्वारे तात्काळ वितरित करावा"** अशी वाचण्यात यावी.

सदर शासन शुद्धिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७२४१६३४००६७१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY MAROTI JAGTAP

Digitally signed by SANJAY MAROTI JAGTAP
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=9ea94b7d58fc204d63a497943e6c56976c537462d5f2964980c30906051d44d7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2C1FC771D686D36A26A8AF979409826984378A73F9D4AEECA990209686CC25BD, cn=SANJAY MAROTI JAGTAP
Date: 2024.07.24 16:48:21 +05'30'

**( संजय जगताप )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन) औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
२. उप आयुक्त (पुनर्वसन), औरंगाबाद
३. जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उपसंचालक, हिंगोली
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, हिंगोली
५. कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, हिंगोली
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)
७. महालेखापाल (लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य,मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)
८. जिल्हा कोषागार अधिकारी, हिंगोली
९. जलसंपदा विभाग, कार्यासन मोप्र-२, मंत्रालय, मुंबई ३२
१०. वित्त विभाग,कार्यासन व्यय-१०, अर्थसंकल्प-३, मंत्रालय, मुंबई-३२.
११. नियोजन विभाग,कार्यासन १४७५, मंत्रालय, मुंबई ३२.
१२. महसूल व वन विभाग, कक्ष अधिकारी ब-१, मंत्रालय, मुंबई - ३२
१३. महसूल व वन विभाग, पी.ए.सी. कार्यासन, मंत्रालय, मुंबई ३२.
१४. निवडनस्ती कार्यासन र-८,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.